**स्व. यशवंतराव चव्हाण माजी मुख्यमंत्री यांचे स्मरणार्थ त्यांचे सातारा येथे स्मारक सभागृह उभारण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय** क्रमांक-बैठक (स्मारक)-२०१६/प्र क्र १०५/पंरा-९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०१७

<u>वाचा:</u>- (१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.स्मारक-२०१६/प्र.क्र.०३/पंरा-९, दिनांक ११ ऑगस्ट, २०१६
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.०४.२०१६
(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र.०७/कोषा-प्र-५, दि.१०.०५.२०१६

<u>प्रस्तावना:-</u>

मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांनी विधानमंडळाच्या अधिवेशनात सन २०१५-१६ आश्वास क्र.५५९ - स्व.यशवंतराव चव्हाण माजी मुख्यमंत्री यांचे स्मारकाबाबतही विचार केला जाईल, असे आश्वासन दिले होते. त्यानुषंगाने, नियुक्त केलेल्या जिल्हाधिकारी, सातारा यांच्या अध्यक्षतेखालील समितीने दि.०७.०३.२०१७ रोजीच्या पत्रान्वये, स्मारक बांधकाम आराखडयातबाबतचा प्रस्ताव शासना मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यानुषंगाने, सदर स्मारकाच्या बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.मंत्री (वित्त) महोदयांनी सन २०१५ च्या पहिल्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात विधानसभेत देण्यात आलेले आश्वासन क्र.५५९ - "स्व.यशवंतराव चव्हाण माजी मुख्यमंत्री यांच्या स्मारकाबाबतही विचार केला जाईल." असे आश्वासन दिले होते. त्यानुषंगाने, जिल्हाधिकारी, सातारा यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय स्मारक समितीने सर्वानुमते मंजूर केलेल्या आराखडयास मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय स्मारक समितीच्या बैठकीत कार्योत्तर मंजूरी घेण्याच्या अधीन राहून सदर स्मारकाच्या बांधकाम आराखडयास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार, सदर स्मारकासाठी उपलब्ध असलेला रु. ७६९.२० लक्ष (अक्षरी रक्कम रुपये सात कोटी एकोणसत्तर लक्ष वीस हजार फक्त) इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांना वितरीत करण्यास खाली अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय स्मारक समितीची मान्यता प्राप्त झाल्यानंतरच स्व. यशवंतराव चव्हाण माजी मुख्यमंत्री यांच्या स्मारकाच्या बांधकामासाठी उपलब्ध

करुन देण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा. या अटींची आहरण व नियंत्रण आणि आहरण व सवितरण अधिकारी तंतोतंत पालन करावे.

३. उपरोक्त स्मारक उभारण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयानुसार कार्यवाही करावी.

४. सदर कामांच्या “ई-निविदा” अंती प्रकल्प खर्च निश्चित करण्यात यावा. सदरचा प्रकल्प खर्च हा तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलल्या प्रकल्प खर्चापेक्षा जास्तीचा असल्यास, अशा जास्तीच्या खर्चासाठी कुठल्याही स्वरुपात अतिरिक्त अनुदान शासनाकडून उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५. “ई-निविदा” अंतीचा प्रकल्प खर्च व तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या प्रकल्प खर्चापेक्षा कमी असल्यास, सदर कमी झालेल्या खर्चाच्या राज्य शासन हिस्स्याची रक्कम शासनास जमा करावी. सदरची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

६. जिल्हाधिकारी, सातारा यांची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील:-

(अ) सदर कामाला “ई-निविदा” कार्यप्रणालीचा अवलंब करणे बंधनकारक राहील. याबाबत सार्वजनिका बांधकाम विभाग तसेच शासनाने निर्गमित केलेल्या अद्यावत मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. “ई-निविदा” कार्यप्रणालीचा अवलंब करण्यात येत असल्याची खातरजमा करणे.

(ब) सदर कामाकरीता उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे, काम गुणवत्तेसार झाले आहे किंवा कसे तसेच मंजूर कामावरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे पाहणे. तसेच दर सहा महिन्यांनी कामांचा आढावा घेणे.

(क) निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहीत प्रक्रियेचे अवलंबन करण्यात यावे. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकाराच्या मर्यादेचा (Financial Power) भंग होणार नाही तसेच, कुठल्याह शासन निर्णय/अधिकाराचा भंग होणार नाही हे पाहणे.

७. दिनांक ३१ मार्च २०१८ अखेर हा निधी खर्च करण्याची मुदत संपल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांनी या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करीता वितरीत करण्यात येणा-या सर्व निधीच्या उपयोगिताचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे. सदरची उपयोगिताचे प्रमाणपत्र एकत्रितरित्या संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करुन खर्चित व अखर्चित निधीचा अहवाल शासनास सादर करावा.

८. या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या एकूण रक्कम रु.७६९.२० लक्ष (अक्षरी रक्कम रुपये सात कोटी एकोणसत्तर लक्ष वीस हजार फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत असून, सदर निधीचे कार्यान्वयन यंत्रणेस वितरण करण्यासाठी मुख्य

कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येतआहे. तसेच, मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांना आहरण व संवितण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येतआहे.

९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांनी सदरचे आहरीत करण्यात येणारे अनुदान दिनांक ३१ मार्च २०१८ अखेर खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी, दिनांक ३१ मार्च, २०१८ अखेरचा अखर्चित निधी व्याजासह शासनाच्या खाती तात्काळ जमा करावा.

१०. या संबंधीचा खर्च मागणी क्र.एल-३, मुख्य लेखाशिर्ष २५१५, उपमुख्य लेखाशीर्ष (००), १९६ जिल्हा परिषदांना / जिल्हास्तरीय पंचायतीनाना सहाय , (००) (०६) थोर व्यक्तींची स्मारके उभारण्याकरिता विशेष कार्यक्रम (राज्यस्तर), (योजनांतर्गत) २५१५२४८६ या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करीता मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

११. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/ प्र.क्र.८९/ अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११७५८५७९९२० असा आहे. हा आदेश डिजटिल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manoj D Jadhav

Digitally signed by Manoj D Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, cn=Manoj D Jadhav
Date: 2017.03.31 18:01:40 +05'30'

**(मनोज जाधव)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा मंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.).यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११.सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मंबई

१२.विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे
१३.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
१५.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , सातारा
१६.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे/ कोल्हापूर
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
१८. योजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
१९.वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
२०.कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
२१.निवड नस्ती (का.यो-६). ग्राम विकानस व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.